**कृती आराखडया अंतर्गत कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण करणे ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना सन २०११ -१२ मध्ये राज्यात राबविण्याकरिता वित्तीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिचि २९११/प्र.क्र. १३६/३-अे,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : ३० जून, २०११.**

**संदर्भ :- १) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२०११-एमएम, दि. ६ मे,२०११**
**२) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२०११ -एमएम, दि. १२ मे,२०११**
**३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक जा.क्र.कृआ/विप्र-५/कृचिकी/कृआ/प्र.क्र.१/४४२/२०११,दि.८ जून,२०११**

**प्रस्तावनाः-**

विकसित कृषि तंत्रज्ञानाचा प्रसार व प्रचार शेतकऱ्यांपर्यन्त प्रभावीपणे व जलदगतीने होऊन त्याद्वारे शेतकऱ्यांना त्या त्या भागातील प्रमुख पिकांचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्याकरिता प्रोत्साहन देऊन सहाय्य करणे, शेतकऱ्यांना नवीन तंत्रज्ञान पुरविण्याकरिता प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे, नवीन तंत्रज्ञानावर आधारित पीक प्रात्यक्षिकांचे आयोजन करणे, माती व पाणी यांची तपासणी करणे, पिकावर येणारी कीड व रोग यांचे निदान करणे या सर्व सुविधा एकाच ठिकाणी उपलब्ध करुन देण्याकरिता सन १९९७-९८ पासून राज्यातील सर्व तालुक्यांमध्ये/जिल्ह्यांमध्ये टप्प्याटप्प्याने कृषि चिकित्सालये स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. आतापर्यन्त राज्यात एकूण २३१ कृषि चिकित्सालये स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन दि.६ मे,२०११ च्या पत्रान्वये कृती आराखडयाअंतर्गत एकूण रु.८५६१.०० लक्ष च्या कार्यक्रमास मान्यता दिलेली आहे.तसेच संदर्भाधिन क्रमांक २ अन्वये कृती आराखडयातील पहिल्या हप्त्याचे रु.३७६८.७९५ लाख (रुपये सदतीस कोटी अडुसष्ट लाख एकोणऐंशी हजार आणि पाचशे फक्त) निधी राज्य शासनास मुक्त केला आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून या योजनेतंर्गत सन २०११-१२ मध्ये राबवावयाच्या कार्यक्रमास **प्रशासकीय व वित्तीय मान्यता** देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण करणे ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना कृति आराखडया अंतर्गत सन २०११-१२ मध्ये राबविण्यास केंद्रीय कृषिमंत्रालयाने संदर्भाधीन दिनांक ६ मे,२०११ च्या पत्रान्वये रु.२००.००लक्ष च्या कार्यक्रमास प्रशासकिय मान्यता दिली असून केंद्र शासनाच्या संदर्भाधिन क्रमांक २ अन्वये पहिल्या हप्ताचा रु.१००.०० लक्ष निधी मुक्त केल्यानुसार केंद्र शासनाच्य मान्यतेच्या अधीन राहून कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण करणे या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०११-१२ करिता रुपये १००.०० लक्ष (रुपये एक कोटी मात्र) इतक्या निधीस शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू मंजूर केलेला रु. १००.००लक्षचा (रुपये एक कोटी मात्र)निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. राज्यातील संबंधित कृषि सह संचालक अथवा अन्य अधिकारी यांना आवश्यकतेनुसार या मंजूर निधीचे वाटप

करण्यास आणि त्याच्या वापराबाबत आवश्यक मार्गदर्शक सूचना देण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधीचे वाटप वित्त विभागाने विकसित केलेल्या संगणकिय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत करण्यात यावे. सदर निधी खर्च करताना मासिक कॅश-फ्लोच्या मर्यादेत राहील याची जबाबदारी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांची राहील.

३. सदरहु निधी केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचना, मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाचे प्रचलित नियम व अटीनुसार खर्च करण्यात यावा. मंजूर निधीचा विनियोग राज्यातील स्थापित केलेल्या २३१ कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण त्यामध्ये लहान बांधकामे, माहिती तंत्रज्ञानाकरिता आणि प्रशिक्षणाकरिता लागणारे साहित्य तसेच कृषि चिकित्सालयावरील शेतकरी प्रशिक्षण, पिक प्रात्यक्षिके, मृद व जल परिक्षण, गांडूळ खताचे उत्पादन करण्यासाठी कीड व रोग यांचे निदान करण्यासाठी करण्यात यावा. सदरहू निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र (Utlization) विहित कालावधीत केंद्र शासनास सादर करण्याची दक्षता संचालक (विस्तार व प्रशिक्षण ) यांनी घ्यावी.

४. सन २०११-१२ मध्ये याप्रित्यर्थ होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व योजनेच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-३
२४०१, पीक संवर्धन
१०९ विस्तार व प्रशिक्षण
(०१) (३६) कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना/ १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना
२१ - पुरवठा व सामुग्री
२७- लहान बांधकामे
५२- यंत्र सामुग्री व साधन सामुग्री
(२४०१ ४०९८)

५. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९८/११/व्यय-१,दिनांक २३ जून,२०११अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार व प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०७०४११५१०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(वीणा राऊत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० जादा प्रतींसह)

सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
कृषि सहसंचालक (विस्तार), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
सर्व तालुका कृषि अधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व सहसचिव / उप सचिव / अवर सचिव (कृषी विभाग),कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
कार्यासन २-अे, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ / निवड नस्ती.